**महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (प्रशासन शाखा) मधील विधी अधिकारी संवर्गात कार्यरत अधिकाऱ्यांना महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) साठीची विभागीय परिक्षा लागू करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विभाप-३३२३ /प्र.क्र ४८ /प्रशा-२**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक: २८ फेब्रुवारी, २०२३

**प्रस्तावना:**

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ११.०२.२०१४ रोजीच्या अधिसूचनेन्वये अधिसूचीत केलेल्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अखत्यारीतील महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब ( प्रशासन शाखा) मधील विधी अधिकारी संवर्गातील मंजूर ३ पदे २ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी सरळसेवेने भरण्यात आली आहेत. सामान्य प्रशासन विभागाच्या विभागीय परीक्षा नियमानुसार सदर संवर्गासाठी विभागीय परीक्षा नियम नसल्याने, विधी अधिकारी पदावर कार्यरत अधिकाऱ्यांची विभागीय परीक्षा घेण्याची कार्यवाही करता येत नाही. परिणामी, त्या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करणे, त्यांच्या नियुक्त्या पुढे चालू ठेवणे, त्यांच्या वेतनवाढी करणे किंवा त्यांच्या ज्येष्ठतासूच्या तयार करणे इत्यादी प्रशासकीय कामांच्याबाबत सध्या तांत्रिक अडचणी निर्माण झाल्या आहेत. त्या तात्काळ दूर करणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय :**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अखत्यारीतील महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ व गट-ब ( प्रशासन शाखा) मधील सरळसेवेने नियुक्त करण्यात येणाऱ्या अधिकाऱ्यांना दिनांक २०.०२.१९८० रोजीच्या अधिसूचनेन्वये लागू असलेली विभागीय परीक्षा महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) मधील विधी अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांना या शासन निर्णयान्वये लागू करण्यात येत आहे.

२. विभागीय परीक्षेवर पाठ्यक्रम व कार्यपध्दती सदर अधिसूचनेत विहीत केल्यानुसार असेल

३. ही परीक्षा महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे यांचेमार्फत घेण्यात येईल.

४. हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू होईल.

५. विधी अधिकारी संवर्गासाठी सुधारीत विभागीय परीक्षा नियम अधिसूचीत झाल्यानंतर सदरचा शासन निर्णय आपोआप व्यपगत होईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२८१४४३४१३४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TIKARAM WAMAN KARPATE

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=340ec5e34f4f31b01be0869a230e89b14739b1c38b24cff0edd0f8088e0c342a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9395C596B57A69FE04109B8C8191E7389CFF5EDA3FAC16C6F8263BE7FBBD319D, cn=TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2023.02.28 14:47:37 +05'30'

**( टि.वा.करपते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, मुंबई
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा . विधानसभा , विधानपरिषद व संसद सदस्य
८. मा . मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
९. मा . उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
१०. अप्पर मुख्य सचिव ( शालेय शिक्षण व क्रीडा विभाग ) यांचे स्वीय सहायक
११. आयुक्त ( शिक्षण ) , महाराष्ट्र राज्य , पुणे
१२. राज्य प्रकल्प संचालक , महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद , चर्नीरोड , मुंबई
१३. सहसचिव / उपसचिव ( विद्यार्थी विकास / शाळा व्यवस्थापन / शिक्षक शिक्षकेत समन्वय / अर्थसंकल्प / क्रीडा ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , मंत्रालय , मुंबई
१४. सर्व शिक्षण संचालक
१५. अध्यक्ष , माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ , महाराष्ट्र राज्य , पुणे
१६. आयुक्त , क्रीडा व युवक सेवा , महाराष्ट्र राज्य , पुणे
१७. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
१९. सर्व शिक्षणाधिकारी ( प्राथमिक / माध्यमिक / प्रौढ
२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२१. सर्व अधिक्षक , वेतन पथक ( प्राथमिक / माध्यमिक )
२२. संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)
२३. सर्व कार्यासने , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , मंत्रालय , मुंबई
२४. निवड नस्ती , प्रशा -२ , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , मंत्रालय , मुंबई.